**इतर मागासवर्गाची यादी**
**" ठाकर " जात इतर मागासवर्गाच्या यादीतून वगळण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग, आणि विशेष मागासप्रवर्ग कल्याण विभाग.**
**शासन निर्णय : क्रमांक : सीबीसी १२/२००० / प्र. क्र. ७६ / इमाव -५**
**मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : २६ जुलै, २०००**

**वाचा :-** १) शासन निर्णय, शिक्षण व समाजकल्याण विभाग, क्रमांक सीबीसी - १४६७- म दिनांक १३ ऑक्टोबर, १९६७.
२) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग, क्रमांक : सीबीसी - १४७५ / २७२ / का-५, दिनांक : ९ डिसेंबर, १९७७
३) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्रमांक : सीबीसी - १४७७ / ५१४६५ / का -५, दिनांक १३ फेब्रुवारी १९७८
४) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्रमांक : सीबीसी - १०७६ / १४७३९ / का -५, दिनांक ११ सप्टेंबर, १९७९
५) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्रमांक : सीबीसी - १४७८ / ३५५०१ / का -५, दिनांक ५ ऑक्टोबर, १९७९
६) शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा व पर्यटन विभाग, क्रमांक : सीबीसी - १०८० / ४३५५३ / का -५, दिनांक ५ जानेवारी, १९८२.
७) शासन परिपत्रक, समाजकल्याण व क्रिडा विभाग, क्रमांक सीबीसी - १४७५ / १९६० / का -५, दिनांक ३ मार्च १९८२.
८) संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे अर्धशासकीय पत्र क्रमांक : ठाकर / ३८१ / डी / २२०३, दिनांक २० ऑगस्ट, १९८१.
९) शासन निर्णय, समाजकल्याण व क्रिडा विभाग, क्रमांक : सीबीसी - १०८२ / ४८५६७ / ( १०६३ ) / का -५, दिनांक ८ जुलै, ८२

**शासन निर्णय** :मा. मुंबई उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र. ११६१ / ९१ मध्ये दिनांक ९ जुन, १९९८ मध्ये दिलेल्या निर्णयामध्ये वर उल्लेख केलेल्या अनुक्रमांक ९ येथील शासन निर्णय हा असांविधानिक व रद्दबातल केला आहे. सदरच्या निर्णयाविरुध्द शासनाने मा. सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्र. २६९२ / ९९ दाखल केली होती. सदरची अनुज्ञा याचिका मा. सर्वोच्च न्यायालयाने दि. १२ जुलै, १९९९ रोजी खारिज केली आहे. त्यामुळे मा. उच्च न्यायालयाचा दिनांक ९ जुन, १९९८ चा वरील निर्णय कायम राहतो. त्यामुळे वर उल्लेखिलेला अनुक्रमांक ९ येथील

समाजकल्याण विभागाचा शासन निर्णय क्रमांक सीबीसी १०८२/४८५६७/(१०६३)/का-५, दि. ८ जुलै, १९८२ रद्द करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चं. रा. गोसावी )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्याचे सचिव,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
मुख्य महानगर दंडाधिकारी,
सर्व विभागीय आयुक्त,
संचालक, विमुक्त जाती, भटक्या जमाती, इतर मागासवर्ग संचानालय, पुणे.
संचालक, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, आदिवासी कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
सर्व जिल्हा दंडाधिकारी
सर्व उप विभागीय अधिकारी ( महसूल )
सर्व उप जिल्हाधिकारी
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मूळ शाखा, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग

**त्यांना विनंती करण्यांत येते की, त्यांनी सदर आदेश त्यांचे अधिपत्याखाली सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांचे निदर्शनास आणून द्यावेत.**

निवड नस्ती का-इमाव-५